**स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी) अंतर्गत हागणदारी मुक्त झालेल्या नागरी स्थानिक स्वराज्य संस्थाना अनुज्ञेय प्रोत्साहन अनुदानापैकी ३०% रकमेचा पहिला हप्ता वितरित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: स्वमअ- २०१६ /प्र.क्र.५६/नवि-३४,**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग
४ था मजला, मंत्रालय, मुंबई
दिनांक- ३० मार्च, २०१७

**वाचा :**

१. शासन निर्णय, नगर विकास विभाग, क्रमांक स्वमअ-२०१६/ प्र.क्र.२३/नवि-३४, दि. २८ मार्च, २०१६.
२. शासन निर्णय, नगर विकास विभाग, क्रमांक स्वमअ-२०१६/ प्र.क्र.५६/नवि-३४, दि. ३१ मार्च, २०१६.
३. शासन निर्णय, नगर विकास विभाग, क्रमांक स्वमअ-२०१६/ प्र.क्र.५६/नवि-३४, दि. ३० ऑगस्ट, २०१६.
४. शासन निर्णय,नगर विकास विभाग, क्रमांक स्वमअ-२०१६/ प्र.क्र.५६/नवि-३४, दि. १६ जानेवारी, २०१७.
५. शासन निर्णय, नगर विकास विभाग, क्रमांक स्वमअ-२०१६/ प्र.क्र.२३/नवि-३४, दि. ३० जानेवारी,२०१७.

**प्रस्तावना :**

केंद्र शासनाच्या "स्वच्छ भारत अभियान (नागरी)" च्या धर्तीवर राज्यामध्ये स्वच्छ महाराष्ट्र अभियानाची अंमलबजावणी नागरी स्थानिक स्वराज्य संस्थामध्ये सुरु आहे. या अभियानांतर्गत हागणदारी मुक्त होणाऱ्या शहरांसाठी संदर्भीय क्रमांक १ येथील दिनांक २८ मार्च, २०१६ च्या शासन निर्णयान्वये प्रोत्साहन अनुदानाची योजना जाहीर करण्यात आलेली आहे. सदर योजनेच्या अंमलबजावणीमध्ये सुधारणा करण्याबाबत संदर्भीय क्रमांक ५ येथील दिनांक ३० जानेवारी, २०१७ च्या शासन निर्णयान्वये सुधारित सूचना देण्यात आल्या आहेत.

२. या अभियानाच्या अंमलबजावणीपासून आतापर्यंत हागणदारी मुक्त झालेल्या शहरांपैकी राज्यस्तरीय समितीमार्फत करण्यात आलेल्या तपासणीमध्ये जी शहरे हागणदारी मुक्त झाल्याचे दिसून आली आहेत अशा शहरांना संदर्भीय क्रमांक २, ३ व ४ येथील शासन निर्णयान्वये अनुज्ञेय प्रोत्साहन अनुदान रकमेच्या ३०% निधीचा पहिला हप्ता वितरीत करण्यात आला आहे. उपरोक्त संदर्भीय क्रमांक २, ३ व ४ येथील शासन निर्णयान्वये अनुज्ञेय प्रोत्साहन अनुदान वितरीत केलेल्या शहरांव्यतिरीक्त उर्वरीत शहरांना प्रोत्साहन रकमेच्या ३०% निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

प्रस्तावनेतील बाबींचा विचार करुन, सन २०१६-२०१७ या आर्थिक वर्षात स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी) अंतर्गत हागणदारी मुक्त झालेल्या व राज्यस्तरीय समितीमार्फत करण्यात आलेल्या तपासणीमध्ये हागणदारी मुक्त झाल्याचे दिसून आलेल्या नगरपरिषदा/नगरपंचायती यांना अनुज्ञेय प्रोत्साहन अनुदान

रकमेच्या ३०% रकमेचा पहिला हप्ता देण्यासाठी रुपये ५,२५,००,०००/- (रूपये पाच कोटी पंचवीस लक्ष फक्त) एवढा निधी वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. प्रोत्साहन अनुदानाचा सदर निधी खालील नगरपरिषदा/ नगरपंचायतीना त्यांच्या नावासमोरील रकाना क्रमांक ६ मध्ये दर्शविण्यात आल्यानुसार वितरीत करण्यात यावा.

(रूपये लाखात)

| **अ.क्र.** | **नगरपरिषद/ नगरपंचायतीं** | **वर्ग** | **जिल्हा** | **अनुज्ञेय प्रोत्साहन अनुदान** | **प्रोत्साहन अनुदानापैकी अनुज्ञेय ३०% निधी** | **प्रोत्साहन अनुदानाचा उर्वरीत निधी** |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| १ | बार्शी | अ | सोलापूर | २००.०० | ६०.०० | १४०.०० |
| २ | बल्लारपूर | ब | चंद्रपूर | १५०.०० | ४५.०० | १०५.०० |
| ३ | कोपरगाव | ब | अहमदनगर | १५०.०० | ४५.०० | १०५.०० |
| ४ | कुळगाव-बदलापूर | ब | ठाणे | १५०.०० | ४५.०० | १०५.०० |
| ५ | जव्हार | क | पालघर | १००.०० | ३०.०० | ७०.०० |
| ६ | पाथर्डी | क | अहमदनगर | १००.०० | ३०.०० | ७०.०० |
| ७ | खुलताबाद | क | औरंगाबाद | १००.०० | ३०.०० | ७०.०० |
| ८ | शेंदूरजना-घाट | क | अमरावती | १००.०० | ३०.०० | ७०.०० |
| ९ | रिसोड | क | वाशिम | १००.०० | ३०.०० | ७०.०० |
| १० | रावेर | क | जळगाव | १००.०० | ३०.०० | ७०.०० |
| ११ | सावदा | क | जळगाव | १००.०० | ३०.०० | ७०.०० |
| १२ | जामनेर | क | जळगाव | १००.०० | ३०.०० | ७०.०० |
| १३ | कसाई-दोडामार्ग | क | सिंधूदुर्ग | १००.०० | ३०.०० | ७०.०० |
| १४ | कळमनूरी | क | हिंगोली | १००.०० | ३०.०० | ७०.०० |
| १५ | सोनपेठ | क | परभणी | १००.०० | ३०.०० | ७०.०० |
| **एकूण** | | | | **१७५०.००** | **५२५.००** | **१२२५.००** |

३. प्रोत्साहन अनुदान म्हणून वितरित करण्यात आलेला उपरोक्त निधी संदर्भीय क्रमांक १ येथील दिनांक २८ मार्च, २०१६ च्या शासन निर्णयातील परिच्छेद-१ (क) मध्ये नमूद केलेल्या बाबींसाठीच

वापरता येईल. उक्त शासन निर्णयातील परिच्छेद १ (क) मधील बाबींवरील खर्च सध्या प्रचलित असलेल्या नियमानुसार संबधित सक्षम प्राधिका-याची मंजूरी घेवून करण्यात यावा.

४. सदरचा निधी आहरित करण्यासाठी संचालक, राज्य अभियान स्वच्छ अभियान (नागरी) यांना आहरण व संवितरण अधिकारी तसेच नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यांनी सदर रकमेचे देयक तयार करुन ते अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई यांचेकडे सादर करुन सदर निधी आहरित करुन घ्यावा व त्यानंतर सदर निधीचे वितरण परिच्छेद २ मधील रकाना क्रमांक ६ मध्ये दर्शविल्यानुसार संबधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थाना तात्काळ करण्यात यावे.

५. सदरचा शासन निर्णय वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक अर्थसं २०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३ दिनांक २० एप्रिल, २०१६ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे

६. वित्त विभाग परिपत्रक क्रमांक अर्थसं २०१६/प्र.क्र. ८९/अर्थ-३ दिनांक २० एप्रिल, २०१६ अन्वये ३१, वेतनेत्तर सहाय्यक अनुदाने या बाबी खालील खर्च करण्यास विभागास अधिकार प्राप्त झाले असून सदर परिपत्रकातील परिच्छेद ७ ते १८ पैकी ७ अ, ७ ब, ८, ९, १०, ११, १२, १३, १४, १५, १६, १७, १८ या प्रकरणी लागू नाही. तसेच या शासन परिपत्रका सोबतच्या परिशिष्टातील अनुक्रमांक ३ आणि ९ मधील लागू असलेल्या सर्व अटींची पूर्तता होत आहे.

७. वित्त विभाग परिपत्रक क्रमांक संकिर्ण २०१६/प्र.क्र.३१/कोषा.प्रशा.५ दिनांक १० मे, २०१६ मधील परिच्छेद ब मधील २ नुसार वित्त विभाग परिपत्रक क्रमांक अर्थसं २०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३ दिनांक २० एप्रिल, २०१६ च्या परिशिष्टातील अनुक्रमांक १, २, ३, ४, ५, ६, ७, ८ या प्रकरणी लागू नाही.

८. वित्त विभाग परिपत्रक क्रमांक संकिर्ण २०१६/प्र.क्र.३१/कोषा.प्रशा.५ दिनांक १० मे, २०१६ मधील परिच्छेद ब मधील ३ नुसार वित्त विभाग परिपत्रक क्रमांक अर्थसं २०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३ दिनांक २० एप्रिल, २०१६ रोजीच्या परिपत्रकात नमूद परिशिष्टातील अनुक्रमांक ९ संदर्भातील तपासणी सुची मधील अनुक्रमांक ३, ४, ५, ६, ७, ८, ९, १० या प्रकरणी लागू नाही. तसेच सदर अनुक्रमांक ९ संदर्भातील तपासणी सुची मधील अनुक्रमांक १ व २ मध्ये नमुद करण्यात आलेल्या अटींची पुर्तता होत आहे.

९. वित्त विभाग परिपत्रक क्रमांक संकिर्ण २०१६/प्र.क्र.३१/कोषा.प्रशा.५ दिनांक १० मे, २०१६ मधील परिच्छेद अ मध्ये नमूद अनुक्रमांक ६, ७, ८, ९ सदरप्रकरणी लागू होत नाही. अनुक्रमांक १ ते ५ बाबतची माहिती पुढील प्रमाणे आहे.

(१) विभागास प्रदान वित्तीय अधिकार:- वित्त विभाग परिपत्रक क्रमांक अर्थसं २०१६/प्र.क्र. ८९/अर्थ-३ दिनांक २० एप्रिल, २०१६ मधील ७ क अन्वये ३१ वेतनेत्तर सहायक अनुदाने या बाबीखालील खर्च करण्यास विभागास अधिकार प्राप्त झाले आहेत.

(२) मंजूर निधी- सदर शासन निर्णयान्वये रुपये ५.२५ कोटी निधी मंजूर करण्यात येत आहे.

(३) मागील ३ महिन्यापूर्वी दिलेल्या अनुदानापैकी ७५% किंवा अधिक निधी खर्च झाला आहे:- या योजनेंतर्गत उपरोक्त नगरपरिषद/नगरपंचायतींना मागील ३ महिन्यापूर्वी निधी वितरीत करण्यात आलेला नाही.

(४) ज्या लेखाशीर्षाखाली अनुदान वितरीत करण्यात येत आहे. त्या लेखाशिर्षांतर्गत १ वर्षापूर्वीचे संक्षिप्त देयक प्रलंबित नाही:- उपरोक्त नमूद लेखाशिर्षांतर्गत १ वर्षापूर्वीचे संक्षिप्त देयक प्रलंबित नाही.

(५) स्थानिक स्वराज्य संस्थांना अनुदान देताना त्यांच्याकडून राज्य शासनास येणे नाही किंवा येणे रक्कम समायोजित करण्यात आली आहे:- स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी) अंतर्गत हागणदारी मुक्त झालेल्या नागरी स्थानिक स्वराज्य संस्थाना प्रोत्साहन अनुदान द्यावयाचे असल्याने सदर रक्कम समायोजित करणे उचित होणार नाही.

१०. सदरचा खर्च मागणी क्रमांक एफ-२ "२२१७, नगर विकास, ८० सर्वसाधारण,१९२ नगरपरिषदांना सहाय्यक (००) (४२) नगर परिषदांना वैशिष्टयपूर्ण कामांसाठी विशेष अनुदान ३१ सहाय्यक अनुदाने (२२१७ १३०१) (वेतनेतर)" या लेखाशिर्षाखाली करण्यात आलेल्या तरतुदीमधून भागविण्यात यावा.

११. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०३३०१३५३१६३८२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Sudhakar Dnyandeo Bobade

Digitally signed by Sudhakar Dnyandeo Bobade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=bc1634ab95abe4652ec2433f0ccd505c20ea3e7ecad3bfcb55d49ad9dbd0fe5e, serialNumber=2e4705465b9bdfd5b38b2d36aae83659869796cb8cc2aefbc550989feec27db1, cn=Sudhakar Dnyandeo Bobade
Date: 2017.03.30 13:55:52 +05'30'

**(सुधाकर ज्ञा.बोबडे)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति :**

१) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
२) मा.राज्यमंत्री, नगर विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३) नगराध्यक्ष, नगरपरिषदा/ नगरपंचायती (संबंधित)
४) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
५) प्रधान सचिव (नवि-२) नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
६) आयुक्त, तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई

७) विभागीय आयुक्त (सर्व)
८) जिल्हाधिकारी (संबंधित)
९) सह सचिव (अर्थसंकल्प) नगर विकास विभाग, मुंबई
१०) महासंचालक, माहिती व जनसंपर्क विभाग, मंत्रालय, मुंबई
११) राज्य अभियान संचालक, स्वच्छ महाराष्ट्र अभिया न (नागरी) मुंबई
१२) मुख्याधिकारी, नगरपरिषदा / नगरपंचायती (संबंधित)
१३) उप संचालक, नगरपालिका शाखा, विभागीय आयुक्त कार्यालय (सर्व)
१४) जिल्हा प्रशासन अधिकारी, नगरपालिका शाखा, जिल्हाधिकारी कार्यालय (संबंधित)
१५) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
१६) अधिदान व लेखाधिकारी, फोर्ट, मुंबई.
१७) अधिदान व लेखाधिकारी, अधिदान व लेखा कार्यालय, वांद्रे, मुंबई.
१८) मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई.
१९) निवडनस्ती, नवि-३४, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई